"बेबी केअर किट" या योजनेकरिता निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२४/प्र.क्र.१४०/का.६**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २९ मार्च,२०२५

**संदर्भ**:-१) म. व बा.वि.वि.शा.नि.क्र. एबावि-२०२३/प्र.क्र.१९७/का.६,दिनांक २४.०७.२०२४.
२) म. व बा.वि.वि.शा.नि.क्र. एबावि-२०२४/प्र.क्र.१४०/का.६,दिनांक २१.१०.२०२४, दि. ०८.०१.२०२५, दि. २५.०२.२०२५ व दि. २१.०३.२०२५

**प्रस्तावना :-**

महिला व बाल विकास विभागांतर्गत महाराष्ट्र राज्यात शासकीय प्राथमिक आरोग्य केंद्र / शासकीय रुग्णालयात गरोदरपणाची नाव नोंदणी केलेल्या व त्याठिकाणी प्रसुती होणा-या महिलांना तसेच नाव नोंदणी शासकीय प्राथमिक आरोग्य केंद्र / शासकीय रुग्णालयात करण्यात आलेली आहे. परंतु, अपवादात्मक परिस्थितीत खाजगी रुग्णालयात काही कारणास्तव प्रसुतीसाठी दाखल केलेल्या महिलांना पहिल्या प्रसुतीच्या वेळी त्यांच्या नवजात बालकांसाठी (मुलगा किंवा मुलगी) "बेबी केअर किट" उपलब्ध करून देण्यात येते. त्यानुसार प्रस्तुत प्रयोजनाकरिता सन २०२४-२५ या अर्थसंकल्पिय वर्षात पुरवठा झालेल्या बेबी केअर किटची देयके अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महिला व बाल विकास विभागांतर्गत "बेबी केअर किट" या राज्य योजनेअंतर्गत संदर्भाधीन दिनांक २४.०७.२०२४ रोजीच्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात पुरवठा झालेल्या "बेबी केअर किट" ची देयके अदा करण्यासाठी खालील विवरपत्रातील रकाना क्रमांक १ मधील लेखाशीर्ष / उद्दिष्टांकरिता रकाना क्रमांक ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे एकूण रुपये २३.४३ कोटी (अक्षरी रुपये तेवीस कोटी त्रेचाळीस लक्ष फ़क्त) इतका निधी या शासन निर्णयान्वये आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांना वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये कोटीत)

| लेखाशीर्ष/उद्दिष्ट | अर्थसंकल्पित तरतुद २०२३-२४ | यापूर्वी वितरीत निधी | या आदेशान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| मागणी क्र. एक्स-१,<br>२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण,<br>१०२-बाल कल्याण,<br>(१७) बेबी केअर किट,<br>(१७)(०१) बेबी केअर किट योजना (कार्यक्रम),<br>२२३५ C २२३<br>३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) | १२०.०० | ९६.५७ | २३.४३ |

२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी नियोजन विभाग व वित्त विभागांनी वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचना, प्रचलित निकष, वित्तीय अधिकार नियम तसेच वित्त विभागाच्या दिनांक १७.०३.२०२५ परिपत्रकामधील तरतुदींचे काटेकोरपणे पालन करुन विहीत कार्यपध्दतीनुसार सदर निधी खर्च करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. १४२/का.१४७२, दिनांक २७.०३.२०२५ तसेच वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. १३६/व्यय-६, दिनांक २९.०३.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२९१८०८११४४३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2025.03.29 21:04:10 +05'30'

(वि. रा. ठाकूर)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),(लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर

२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.

३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.

४) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास.

५) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी(महिला व बाल विकास),जिल्हा परिषद

६) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी) प्रकल्प

७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

८) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.

९) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई.

१०) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४७२) / वित्त विभाग (व्यय-६), मंत्रालय, मुंबई

११) कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२) निवड नस्ती -का-६.